**राज्यातील न्यायालयांमध्ये प्रलंबित असलेली प्रकरणे लवकरात लवकर निकाली काढण्यासाठी १०० जलदगती न्यायालयांना दि. १ एप्रिल, २०२२ ते दि. ३१ मार्च, २०२७ या ५ वर्षाच्या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधी व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमां क : जगन्या २०१६/प्र.क्र.१७६/का- नऊ**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक :- ०१.०४.२०२२

**वाचा :-**

१) विधी व न्याय विभाग, शासन निर्णय,क्र. : एफटीसी २०१०/प्र.क्र.८३/नऊ, दिनांक २३ मार्च, २०११.

२) विधी व न्याय विभाग, शासन निर्णय,क्र. : जगन्या २०१६/प्र.क्र.१७६/नऊ,दिनांक ३१ मार्च, २०१६.

३) विधी व न्याय विभाग, शासन निर्णय,क्र. : जगन्या २०१६/प्र.क्र.१७६/नऊ,दिनांक २२ एप्रिल, २०२१

४) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे दि.१६ फेब्रुवारी, २०२२ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

११ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत राज्यातील न्यायालयांमध्ये प्रलंबित असलेली प्रकरणे लवकरात लवकर निकाली काढण्यासाठी राज्यामध्ये एप्रिल २००१ पासून एकूण १८७ जलदगती न्यायालये स्थापन करण्यात आली होती. तसेच, या योजनेला केंद्र शासनाकडून सन २०११ पर्यंत निधी उपलब्ध करून देण्यात आला होता.

जलदगती न्यायालयांची असलेली आवश्यकता व उपयोगिता विचारात घेऊन, १८७ जलदगती न्यायालयांपैकी १००जलदगती न्यायालयांना संदर्भ क्र. १, २ व ३ येथील शासन निर्णयान्वये वेळोवेळी मुदतवाढीस व यासाठीचा खर्च राज्याच्या निधीतून भागविण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र. ३ येथील दि. २२.०४.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर १०० जलदगती न्यायालयांना २०२१-२०२२ या १ वर्षाच्या कालावधीसाठी देण्यात आलेली मुदतवाढ दि. ३१.०३.२०२२ रोजी संपुष्टात येत असल्यामुळे, त्यांना पुढील मुदतवाढ देणेबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालयाने संदर्भ क्र.४ अन्वये शासनास सादर केला आहे. सदर १०० जलदगती न्यायालयांना ५ वर्षांकरीता मुदतवाढ देण्यास मा. मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर १०० जलदगती न्यायालयांना पुढील ५ वर्षांच्या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील न्यायालयांमध्ये प्रलंबित असलेली प्रकरणे लवकरात लवकर निकाली काढण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या १००जलदगती न्यायालयांना दिनांक १ एप्रिल, २०२२ ते दिनांक ३१ मार्च, २०२७ या ५ वर्षाच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

तसेच, सदर न्यायालयांकरीता आवश्यक असणारी तदर्थ जिल्हा न्यायाधीश व त्यांच्या सहाय्यभूत कर्मचारी वर्गासह पुढीलप्रमाणे एकूण ५०० पदे पुढे सुरु ठेवण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | तदर्थ जिल्हा न्यायाधीश | १०० |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १०० |
| ३ | पेशकार (वरिष्ठ लिपिक) | १०० |
| ४ | कनिष्ठ लिपिक | १०० |
| ५ | शिपाई | १०० |
| | **एकूण पदे** | ५०० |

२. उपरोक्त पदे अस्थायी असल्याने सदर पदांना वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित होणा-या शासन निर्णयानुसार मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

३. ज्या जिल्ह्यांच्या ठिकाणी मागासवर्गीयांवरील अत्याचारांची प्रकरणे, महिला अत्याचाराची/ बलात्काराची प्रकरणे, भ्रष्टाचाराची प्रकरणे, मोटार अपघात दाव्याच्या भरपाईची प्रकरणे, न्यायालयीन बंदी, भू-संपादनाची प्रकरणे जास्त प्रमाणात प्रलंबित आहेत अशी प्रकरणे प्राथम्याने व जलदगतीने चालविण्यासाठी जलदगती न्यायालयांकडे वर्ग करण्यात यावीत.

४. सदर जलदगती न्यायालयांमध्ये वर्ग/दाखल होणाऱ्या, निकाली काढण्यात येणाऱ्या व प्रलंबित राहणाऱ्या प्रकरणांचा जिल्हानिहाय मासिक अहवाल उच्च न्यायालय, मुंबई यांनी संबंधितांकडून प्राप्त करून घ्यावा व त्याचा आढावा घेऊन एकत्रित मासिक अहवाल शासनास सादर करावा.

५. याकरीता येणारा खर्च "२०१४, न्यायदान- (भारित) १०२- उच्च न्यायालये, १०२ (०९) (०१) न्यायालयाची दर्जावाढ व प्रलंबित प्रकरणे त्वरित निकालात काढण्यासाठी विशेष अनुदान क्र. २०१४ ०३८८" या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने तसेच, वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २६९/२०२२/व्यय-५, दिनांक ०२.०३.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२२०४०११२५६५३७११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HODAWADEKAR ANAND BHARAT

Digitally signed by HODAWADEKAR ANAND BHARAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0fccc37dcb4df84557086c3e03ca2237fcb16310ff5175370bf8e7719a02477e, pseudonym=B5831A1A752C2B9B028DAE403EFAAEE70CBC5944, serialNumber=22A102F28897F7CAE68B80F4942F265D6F71566570CEC799DFB3DB3B60C8864F, cn=HODAWADEKAR ANAND BHARAT
Date: 2022.04.01 12:59:29 +05'30'

**(आनंद भारत होडावडेकर)**

**उप विधि सल्लागार-नि-उप सचिव**

**प्रति:-**

१. मा.राज्यपालांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद,
४. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
५. संबंधित प्रमुख न्यायाधीश, जिल्हा व सत्र न्यायालये / कौटुंबिक न्यायालये,
६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा / मुळ शाखा), मुंबई,
७. प्रबंधक, उच्च न्यायालय, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ,
८. संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,
९. सह संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, उत्तन/नागपूर,
१०. सदस्य सचिव, विधि सेवा प्राधिकरण, मुंबई,
११. महालेखापाल- एक (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई,
१२. महालेखापाल- दोन (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर,
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१५. वित्त विभाग, वित्त आयोग कक्ष /व्यय-५/ अर्थ-११/ विआक,
१६. विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने.
१७. निवडनस्ती